**राष्ट्रीय कृषि विकास योजने अंतर्गत रोग अन्वेषण विभाग, औंध, पुणे-६७ या संस्थेमध्ये एव्हियन इन्फ्लुएंजा आणि इतर झुनॉटीक पशुरोगांच्या निदानासाठी टर्न की बेसिस तत्वावर जैवसुरक्षा स्तर-२ आणि ३ प्रयोगशाळा उभारण्यास प्रशासकीय मंजूरी प्रदान करणे बाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्यव्यवसाय विभाग,**
**शासन निर्णय क्र. : राकृवि-२०१६/प्र.क्र.२७३ /पदुम-४,**
**मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,**
**मंत्रालय विस्तार, मुंबई ४०० ०३२**
**दिनांक: १८ डिसेंबर, २०१८.**

वाचा:- १. कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्यव्यवसाय विभाग समक्रमांक शासन निर्णय दि.२९.०४.२०१७ ,

२. केंद्र शासनाच्या कृषि व शेतकरी कल्याण (राकृवियो विभाग) विभागाचे पत्र क्र.१-१५ / २०१८- राकृवियो दि.०५.११.२०१८

३. कृषि विभागाचे पत्र क्र. राकृवि- ०५१८ /प्र.क्र.१६२ / १४-अे, दि.११.१२.२०१८

४. आयुक्त पशुसंवर्धन, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे पत्र क्र.एफवायपी-१७ (१८) / सीआर १५४ / २०२७ / आरकेव्हिवाय /२०१८, पसं ६, दि. १३.१२.२०१८

**प्रस्तावना :**

राष्ट्रीय कृषि विकास योजनेंतर्गत पशुरोग अन्वेषण विभाग, औंध, पुणे या संस्थेमध्ये एव्हियन इन्फ्लुएंजा आणि इतर झुनॉटीक पशुरोगांच्या निदानासाठी टर्न की बेसिस तत्वावर जैवसुरक्षा स्तर-३ प्रयोगशाळा उभारण्यास वाचा- १ येथील दि.२९.०४.२०१७ च्या शासन निर्णयान्वये प्रशासकीय मंजूरी प्रदान करण्यात आलेली आहे.

सदर मंजूर प्रकल्पामध्ये अंशता: बदल करुन त्यामध्ये जैव सुरक्षा स्तर २ प्रयोगशाळांचा समावेश करणे आणि प्रकल्पाच्या अनुषंगाने खर्चाच्या सुधारीत मानकास राष्ट्रीय कृषि विकास योजनेच्या राज्यस्तरीय प्रकल्प मंजूरी समितीची मान्यता घेण्यासाठी सदर समितीच्या २५ व्या सभेत सदर प्रस्ताव सादर करण्यात आला असता, समितीने सदर प्रस्तावास तत्वता: मान्यता प्रदान करुन, या प्रकल्पास केंद्र शासनाच्या पदुम विभागाचे अभिप्राय प्राप्त करुन घेण्याचे निर्देश प्राप्त झालेले होते.

केंद्र शासनाच्या वाचा- २ येथील पत्रान्वये राष्ट्रीय कृषि विकास योजनेंतर्गत अंतर्गत पशुरोग अन्वेषण विभाग, औंध, पुणे या संस्थेमध्ये एव्हियन इन्फ्लुएंजा आणि इतर झुनॉटीक पशुरोगांच्या निदानासाठी टर्न की बेसिस तत्वावर जैवसुरक्षा स्तर-२ व जैवसुरक्षा स्तर-३ प्रयोगशाळा उभारण्यास केंद्र शासनास सादर करण्यात आलेल्या सुधारीत प्रकल्प प्रस्तावास मान्यता प्रदान केलेली आहे.

वाचा- ३ येथील पत्रान्वये राष्ट्रीय कृषि विकास योजने अंतर्गत पशुरोग अन्वेषण विभाग, औंध, पुणे-६७ या संस्थेमध्ये एव्हियन इन्फ्लुएंजा आणि इतर झुनॉटीक पशुरोगांच्या निदानासाठी टर्न की बेसिस तत्वावर जैवसुरक्षा स्तर-२ आणि ३ प्रयोगशाळा उभारण्यास राष्ट्रीय कृषि विकास योजनेच्या मार्गदर्शक सूचनेनुसार प्रकल्पाकरीता ५ टक्के मर्यादेपर्यत Consultancy Charges अदा करण्याच्या अटीस अधिन राहून प्रकल्पास मान्यता प्रदान केलेली आहे व सदर प्रकल्पाची अंमलबजावणी करण्यास देखील मान्यता प्रदान केलेली आहे.

त्या अनुषंगाने वाचा- १ येथील शासन निर्णय अधिक्रमीत करुन खालीलप्रमाणे शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहे.

**शासन निर्णय :**

राष्ट्रीय कृषि विकास योजने अंतर्गत “Creation of BSL II & III Laboratory For Avian Influenza And Other Zoonotic Pathogens at Disease Investigation Section, Pune” या सुधारीत प्रकल्प प्रस्तावास याद्वारे शासनाची प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात येत आहे. तसेच, या प्रकल्पासाठी येणारा खर्च रु. ७०.०० कोटी यास वित्तीय मान्यता देखील प्रदान करण्यात येत आहे. सदरचा प्रकल्प सन २०१८-१९ ते २०१९-२० या कालावधीमध्ये राष्ट्रीय कृषि विकास योजनेंतर्गत उपलब्ध होणाऱ्या निधीच्या अधीन राहून प्रकल्प सल्लागार संस्था (Project Management Consultant) द्वारे टर्न की तत्वावर पूर्ण करण्यात यावा.

**अ) प्रकल्पाचे आर्थिक निकष :**

**१.** जैवसुरक्षास्तर- २ व ३ ची पशु रोग अन्वेषण व निदान प्रयोगशाळा राज्यात टर्न की तत्वावर प्रकल्प सल्लागार संस्था (Project Management Consultant) द्वारे प्रथमच उभारण्यात येत असल्याने, अशा प्रकारचे प्रकल्प यशस्वीरित्या उभारणीचा प्रत्यक्ष अनुभव असलेल्या यंत्रणेमार्फतच या प्रयोगशाळेची उभारणी करण्यात यावी.

२. या प्रकल्पांतर्गत खालीलप्रमाणे बाबनिहाय खर्चाच्या मानकास मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

**( रु.कोटीत)**

| अक्र | **खर्चाचा तपशील** | **एकुण** |
|---|---|---|
| १. | बीएसएल-II, बीएसएल III व अनुषंगीक प्रयोगशाळा व प्रशासकीय इमारतीचे बांधकाम (आर्किटेक्चरल डिझाईन, साईट ॲन्ड सिव्हील कंन्स्ट्रक्शन ॲन्ड ॲमिनिटीज, फर्निचर, सिक्युरिटी फॉर सेस्मिक अटॅक, फायर प्रोटेक्शान ॲन्ड फायर फाईटींग सिस्टिम) प्रकल्प समन्वय सल्लागार यांचे कन्स्टल्टन्सी चार्जेस (५ टक्के मर्यादेच्या अधिन राहून), अंतर्गत रस्ते, सीवेज डिस्पोजल सिस्टिम, डीकॉन्टॅमीनेशन सिस्टिम, एक्स्टर्नल वॉटर सप्लाय सिस्टिम, स्टॉर्म वॉटर ड्रेनेज, रेन वॉटर हार्वेस्टिंग सिस्टिम, सोलर सिस्टिम, ग्रीन बिल्डींग कन्सेप्ट, वॉटर सॉफ्टनिंग प्लॅन्ट, संरक्षक भिंत, लॅन्डस्केपिंग व इतर अनुषंगीक खर्च | ३०.०० |
| २. | इलेक्ट्रिकल व इतर (एच व्हॅक ॲन्ड कंट्रोल इन्क्लूडींग प्लंबिग, इलेक्ट्रिकल, सीसीटिव्ही नेटवर्क व लॅन सिस्टिम इ.) जनरेटरद्वारे पॉवर बॅकअप, युपीएस, लिफ्ट्स, इलेक्ट्रिकल सिक्युरिटी व इतर अनुषंगीक खर्च | १७.०० |
| ३. | यंत्र सामुग्री उपकरणे, (उपकरणे, संयत्रे व त्याची उपउपकरणे, यंत्रसामुग्री साधनसामुग्री, प्रयोगशाळा किरकोळ वापराची साधने, डीस्पोजेबल्स, लॅबवेअर इ.) आय.टी ॲन्ड कम्युनिकेशन नेटवर्क डेव्हलपमेंट, संकेतस्थळाची उभारणी करणे, प्रयोगशाळेस लागणारे सॉफ्टवेअर डेव्हलपमेंट करणे व इतर अनुषंगीक खर्च | २३.०० |
| | **एकुण** | **७०.००** |

राज्यस्तरीय प्रकल्प मंजूरी समितीने मंजूर केलेल्या निधीच्या अधिन राहून सदर प्रकल्पासाठी खर्च करण्यात यावा.

३. या प्रकल्पासाठी प्रकल्प सल्लागार संस्थेची (Project Management Consultant) नेमणूक ही विहीत शासन पध्दतीचा अवलंब करून करण्यात यावी व तांत्रिक सल्लागार समितीच्या मार्गदर्शन व शिफारशीनुसार त्यांचे ५ टक्के मर्यादेच्या अधिन राहून शुल्क निश्चित करण्यात यावे. सदरचा प्रकल्प हा टर्न की तत्वावर उभारण्यात येत असल्यामुळे, नियुक्त प्रकल्प सल्लागार संस्था (Project Management Consultant) हे प्रकल्पातील सर्व बाबींच्या एकत्रितरित्या अंमलबजावणी करण्यासाठी जबाबदार असतील.

४. Biosafety Level-२ & Biosafety Level-३, Biosecurity & Biocontainment च्या नियमानुसार या प्रयोगशाळेची उभारणी करावयाची असल्याने, सदर प्रकल्पासाठी लागणाऱी सर्व संयंत्रे व उपकरणे यांची तांत्रिक मानके कृषी, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभागाचा शासन निर्णय क्रमांक संकीर्ण २०१६/प्र.क्र.१९/पदुम ४, दिनांक १३.५.२०१६ अन्वये गठीत करण्यात आलेल्या तांत्रिक विनिर्देश समितीमार्फत निश्चित करुन, ई-निविदा प्रक्रीया राबवून खरेदी करण्यात यावीत.

५. प्रकल्पांतर्गत सर्व कामाच्या निविदा प्रक्रिया राबविणे तसेच, सयंत्रे, यंत्र सामुग्री व उपकरणे यांचे तांत्रिक विनिर्दिष्ट निश्चित करणे व अनुषंगिक खरेदी प्रक्रिया तांत्रिक सल्लागार समितीच्या शिफारशीनुसार प्रकल्प सल्लागार संस्था (Project Management Consultant) यांनी करावी.

६. आदर्श प्रयोगशाळा आचरण प्रणालीनुसार या प्रयोगशाळेची उभारणी करण्यात यावी.

७. सदर प्रकल्पाचे अमंलबजावणी अधिकारी सहआयुक्त पशुसंवर्धन, रोग अन्वेषण विभाग, औंध, पुणे हे राहतील. तर, आयुक्त पशुसंवर्धन, महाराष्ट्र राज्य, पुणे हे या प्रकल्पाचे सनियंत्रण अधिकारी राहतील.

**ब) तांत्रिक संनियंत्रण समिती (Technical Monitoring Committee) व प्रकल्प सनियंत्रण समिती (Project Monitoring Committee) :**

प्रकल्पाच्या कामकाजावर नियंत्रण रहावे यासाठी खालीलप्रमाणे तांत्रिक संनियंत्रण समिती (Technical Monitoring Committee) व प्रकल्प सनियंत्रण समिती (Project Monitoring Committee) गठीत करण्यात येत आहेत.

**१. तांत्रिक संनियंत्रण** समिती **(Technical Monitoring Committee)**

| | | |
|---|---|---|
| १. | आयुक्त पशुसंवर्धन, महाराष्ट्र राज्य, पुणे | अध्यक्ष |
| २. | अतिरिक्त आयुक्त पशुसंवर्धन, आयुक्त पशुसंवर्धन कार्यालय, पुणे | सदस्य |
| ३. | संचालक / प्रतिनिधी निषाद, भोपाल | सदस्य |
| ४. | संचालक / प्रतिनिधी एन आय व्ही, पुणे | सदस्य |
| ५. | सहसंचालक / प्रतिनिधी, दक्षिण विभागीय संदर्भीय रोगनिदान प्रयोगशाळा, बेंगलोर | सदस्य |
| ६. | यांत्रिकी अभियंता / प्रतिनिधी, एन आय व्ही, पुणे | सदस्य |
| ७. | उपआयुक्त (रोग नियंत्रण), आयुक्त पशुसंवर्धन कार्यालय, पुणे | सदस्य |
| ८. | प्रमुख, आयव्हिआरआय ट्रेनिंग ॲन्ड एज्युकेशन सेंटर, पुणे | सदस्य |
| ९. | सहआयुक्त पशुसंवर्धन, रोग अन्वेषण विभाग, पुणे. | सदस्य सचिव |

**२. प्रकल्प सनियंत्रण समिती**

| | | |
|---|---|---|
| १. | आयुक्त पशुसंवर्धन, महाराष्ट्र राज्य, पुणे | अध्यक्ष |
| २. | उपसचिव (पशुसंवर्धन) कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई | सदस्य |
| ३. | मुख्य लेखा व वित्त अधिकारी, आयुक्त पशुसंवर्धन कार्यालय, पुणे | सदस्य |
| ४. | अधिक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, पुणे | सदस्य |
| ५. | कार्यकारी अभियंता (विद्युत), सार्वजनिक बांधकाम विभाग, पुणे | सदस्य |
| ६. | प्रकल्प व्यवस्थापक, प्रकल्प सल्लागार संस्था | सदस्य |

| | | |
|---|---|---|
| ७. | यांत्रिकी अभियंता / प्रतिनिधी, एन आय व्ही, पुणे | सदस्य |
| ८. | उपआयुक्त (रोगनियंत्रण), आयुक्त पशुसंवर्धन कार्यालय, पुणे | सदस्य |
| ९. | उपआयुक्त (नियोजन व अंदाज ), आयुक्त पशुसंवर्धन कार्यालय, पुणे | सदस्य |
| १०. | सहआयुक्त पशुसंवर्धन, रोग अन्वेषण विभाग, औंध, पुणे | सदस्य सचिव |

३. प्रकल्प सल्लागार संस्थेची निवड उपरोक्त प्रमाणे गठीत करण्यात आलेल्या तांत्रिक संनियंत्रण समितीमार्फत निकष व कार्य पध्दती ठरवून करण्यात यावी.

४. रोग अन्वेषण विभाग औध, पुणे या संस्थेतील अधिकारी यांनी यशस्वीरित्या कार्यरत बीएसएल- २ व बीएसएल-३ संस्थांना भेटी देणे, विविध क्षेत्रातील तज्ञांशी चर्चा करणे, सादरीकरण, प्रात्यक्षिक व इतर आवश्यक बाबींचा अभ्यास करून प्रयोगशाळा उभारणीसाठी आवश्यक ते निकष निश्चित करावेत.

५. प्रकल्प अंमलबजावणीच्या अनुषंगाने आवश्यक सर्व बाबींची मान्यता, तांत्रिक संनियंत्रण समिती व प्रकल्प सनियंत्रण समिती यांचेकडून प्रकल्प सल्लागार संस्था (Project Management Consultant) यांनी प्राप्त करून घ्यावी.

६. आयुक्त पशुसंवर्धन, पुणे तसेच, सहआयुक्त पशुसंवर्धन, रोग अन्वेषण विभाग, औंध, पुणे यांनी संयुक्तपणे प्रकल्प सल्लागार संस्था (Project Management Consultant) यांचेसोबत सविस्तर सामंजस्य करार करावा.

७. प्रकल्पाअंतर्गत कंत्राटाद्वारे व इतर खरेदी पध्दतीने उभारण्यात येणा-या सर्व बाबींसाठी ५ वर्षांची सर्व समावेशक (कॉंप्रीहेन्सीव्ह) वॉरंटी प्रकल्प सल्लागार संस्था (Project Management Consultant) यांचेमार्फत घेण्यात यावी.

८. प्रकल्प सनियंत्रण समितीच्या शिफारशीनुसार प्रकल्पांतर्गत प्रकल्प सल्लागार संस्था (Project Management Consultant) यांना वेळोवेळी निधी वितरित करण्यात यावा.

९. या प्रकल्पाअंतर्गत मंजूर व उपलब्ध निधी पूर्णपणे खर्च करुन, तशा आशयाचे विहित प्रपत्रातील उपयोगिता प्रमाणपत्र आयुक्त पशुसंवर्धन, पुणे यांनी शासनास सादर करावे. जेणेकरुन, ते प्रधान सचिव (पदुम) यांच्या प्रतिस्वाक्षरीने राष्ट्रीय कृषि विकास योजना कक्ष यांचेकडे सादर करण्यात येईल.

१०. सदर प्रकल्पास आयुक्त पशुसंवर्धन, महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी तांत्रिक मंजूरी प्रदान करावी.

११. प्रकल्पाची अंमलबजावणी करत असताना, संस्थेअंतर्गत जैवसुरक्षा समिती, परिरक्षण समिती, इत्यादींचे गठण सहआयुक्त पशुसंवर्धन, रोग अन्वेषण विभाग, पुणे यांनी करावे. या समिती सदस्यांसाठी अनुषंगिक प्रशिक्षण यशस्वी निविदाकाराद्वारे आयोजीत करण्यात यावे.

१२. सदरचा प्रकल्प राज्यस्तरीय प्रकल्प मंजूरी समितीच्या दि. २३.०१.२०१७ व दि. २५.०७.२०१८ रोजीच्या बैठकीतील निर्णय व राष्ट्रीय कृषि विकास योजनेच्या मार्गदर्शक सूचना विचारात घेवून राबविण्यात यावा.

१३. या प्रकल्पाचा समावेश संबंधित जिल्हयाच्या जिल्हा कृषि आराखडयात (CDAP) करण्यात येवून तसे, राष्ट्रीय कृषि विकास योजना कक्ष यांना तसेच या कक्षास कळविण्यात यावे.

१४. केंद्र शासनाने विकसीत केलेल्या RDMIS या प्रणालीवर या प्रकल्पाची माहिती भरण्यात यावी. तसेच, प्रकल्पाच्या आर्थिक खर्चाचा आणि भौतिक साध्याचा मासिक प्रागतीक अहवाल नियमितपणे शासनास सादर करावा.

१५. प्रकल्प राबविताना त्याची अंमलबजावणी, सनियंत्रण आणि मुल्यमापन करणे याबाबत आवश्यक तो समन्वय, अंमलबजावणी यंत्रणांनी आयुक्त कृषि, महाराष्ट्र राज्य, पुणे यांच्याशी ठेवावा.

१६. सदर प्रकल्पाची यशस्वी अंमलबजावणी होण्यासाठी आवश्यक त्या सविस्तर मार्गदर्शक सूचना आयुक्त पशुसंवर्धन महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी सहआयुक्त पशुसंवर्धन, रोग अन्वेषण विभाग, पुणे यांना तात्काळ निर्गमित कराव्यात.

आयुक्त पशुसंवर्धन, पुणे तसेच सहआयुक्त पशुसंवर्धन, रोग अन्वेषण विभाग, पुणे यांच्या स्तरावरुन वाचा- १ येथील शासन निर्णय दि.२९.०४.२०१७ मधील तरतूदीनुसार प्रकल्प अंमलबजावणीच्या अनुषंगाने प्रकल्प सल्लागार संस्थेची (Project Management Consultant) नेमणूक व इतर कार्यवाही यापूर्वीच केली असल्यास, ती पूनश्च करण्याची आवश्यकता नाही.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आलेला असून त्याचा सांकेतांक २०१८१२१८१२२३५३५२०१ असा आहे. हा शासन निर्णय डीजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

**महाराष्ट्राचे राज्यापाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,**

Digitally signed by Vijay K. Chaudhari
Date: 2018.12.18 12:31:57 +05'30'

**( विजय चौधरी )**
**उप सचिव,महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. सचिव (कृषि), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई.
२. आयुक्त पशुसंवर्धन, महाराष्ट्र राज्य, पुणे-६७.

३. आयुक्त (कृषि) महाराष्ट्र राज्य, पुणे.
३. उपसचिव (राकृवियो कक्ष ), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई.
४. सहआयुक्त पशुसंवर्धन, पशुरोग अन्वेषण विभाग, औंध, पुणे-६७
५. महालेखापाल, मुंबई / नागपूर (लेखा व अनुज्ञेयता / लेखा परिक्षण)
६. निवड नस्ती पदुम-४